**माहितीचा अधिकार अधिनियम, २००५**
**दर आठवड्यास नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख उपलब्ध करुन देणे या प्रयोगाची सार्वत्रिक अंमलबजावणी करावी किंवा कसे याचा अभ्यास करण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण२०१८/प्र.क्र.४५/कार्या-६**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४००० ०३२**
**दिनांक २६ नोव्हेंबर, २०१८**

**प्रस्तावना:-**

माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ अंतर्गत प्राप्त होणा-या माहिती अर्जांची संख्या कमी होण्याच्या दृष्टीने व कामकाजात पारदर्शकता येण्यासाठी पुणे महानगरपालिकेने जावक क्र. मआ/से/१०६२, दिनांक ३१.७.२००९च्या आदेशान्वये, नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख उपलब्ध करुन देण्याचा प्रयोग केला होता. पुणे महानगरपालिकेच्या या प्रयोगाची सार्वत्रिक अंमलबजावणी करावी किंवा कसे याचा अभ्यास करण्यासाठी एक तज्ञ समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दर आठवड्यास नागरिकांना अवलोकनासाठी अभिलेख उपलब्ध करुन देणे या पुणे महानगरपालिकेच्या प्रयोगाची व्यवहार्यता तपासून त्याची सार्वत्रिक अंमलबजावणी करावी किंवा कसे याबाबत अभ्यास करुन त्या अनुषंगाने शिफारस करण्यासाठी तज्ञ समितीची स्थापना करण्यात येत आहे.

२. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, कोकण विभाग | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे | सदस्य |
| ३ | जिल्हाधिकारी, कोल्हापूर | सदस्य |
| ४ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड | सदस्य |
| ५ | पोलिस अधिक्षक, औरंगाबाद | सदस्य |
| ६ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ७ | अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती | सदस्य |
| ८ | डॉ. चंद्रकांत पुलकुंडवार, सहसंचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ | सदस्य |
| ९ | संचालक, माहिती अधिकार केंद्र, यशदा, पुणे | सदस्य सचिव |

३. सदर समिती माहिती अधिकार अधिनियमांतर्गत जिल्हास्तरापासून निम्नस्तरीय कार्यालयात प्राप्त/प्रलंबित अर्ज, प्रथम अपील, द्वितीय अपील व त्यांचा निपटारा यांचा सविस्तर अभ्यास करुन नागरिकांना अभिलेख, अवलोकनासाठी उपलब्ध करुन देण्यासंदर्भात पुढील बाबींसंदर्भात शिफारस करेल.

- दर आठवड्यास विहित वेळेत नागरिकांना अभिलेख अवलोकनासाठी उपलब्ध करुन देणेबाबतची व्यवहार्यता
- सदरील काम जन माहिती अधिकारी यांचेकडे सोपवावे किंवा कसे याची तपासणी
- ही संकल्पना राबविल्यामुळे माहिती अधिकार अर्ज व अपिल अर्जांचे प्रमाण निश्चितपणे कमी होईल किंवा कसे याची तपासणी
- एकाच दिवशी एकाच वेळी जन माहिती अधिका-याकडे अनेक नागरिकाची गर्दी झाल्यास अशा प्रकरणी अभिलेख उपलब्ध करुन देण्याकरिता अवलंबण्याची कार्यपद्धती
- एकाच विषयाच्या अभिलेखाची मागणी अनेक नागरिकांनी एकाच दिवशी केल्यास अभिलेख उपलब्ध करुन देण्याची कार्यपध्दती
- अभिलेख अवलोकनाकरिता ज्येष्ठ नागरिक, अपंग, महिला, दूर अंतरावरून आलेले नागरिक यासारखे अनेकविध प्रकारचे नागरिक उपस्थित झाल्यास त्यांचा प्राथम्यक्रम निश्चिती
- नागरिकांनी अभिलेख हाताळताना त्यांचेवर लक्ष ठेवण्यासाठी लागणारे अधिकारी / कर्मचारी यांची नियुक्ती
- अवलोकनानंतर नागरिकांनी अभिलेखाच्या छायांकित प्रतीची मागणी केल्यानंतर आवश्यक शुल्क भरणे, याबाबतची सविस्तर नोंद संबंधित रजिस्टरमध्ये घेणे, संबंधित प्रती उपलब्ध करुन देणे, इत्यादी बाबींकरिता कार्यपध्दती
- अभिलेख अवलोकना दरम्यान संबंधितांनी कागदपत्रे फाडणे, गहाळ करणे, मजकुरात खाडाखोड करणे अथवा संबंधित जन माहिती अधिका-यास दटावणे इत्यादी बाबी घडल्यास सदर अभिलेखे आणि संबंधित अधिकारी /कर्मचा-यांच्या सुरक्षिततेसाठी करावयाच्या उपाययोजना
- ही संकल्पना राबविण्याकरिता किती साधनसंपत्ती व मनुष्यबळ खर्ची घालावे लागेल याची तपासणी
- सदर संकल्पना यशस्वीपणे कार्यान्वित होण्यासाठी योजनेची निश्चित कार्यपध्दती

४. सदर समितीने उपरोक्त बाबींची सखोल छाननी करुन तीन महिन्यात अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णयाचा संगणक संकेतांक २०१००२०९३९५३८४४५००७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बिपिन मल्लिक)
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रबंधक (मूळ शाखा/ अपील शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व) मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी
महासंचालक, यशदा, पुणे